वितरण आदेश

नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षासाठीची टर्न कि फी शुल्क (सयंत्र डागडूजी) रक्कम वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीएस २०२२/प्र.क्र.४४/योजना-५**
बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : १६ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र. २५३/१६/२०१७ - BIOGAS, दिनांक ३० मे, २०१८
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक : २५३/१६/२०१७-BIOGAS , दिनांक २४ जुलै, २०२०
३) शासन पत्र क्रमांक बीजीएस-२०२०/प्र.क्र.२१/योजना-५, दिनांक २१ सप्टेंबर, २०२०
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. २५३/३४/२०२०-BIOGAS , दिनांक ३० सप्टेंबर, २०२०
५) केंद्र शासनाचे पत्र क्र. २५३/३५/२०२०-BIOGAS , दिनांक २९ सप्टेंबर, २०२०
६) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०१८/प्र.क्र.९०/योजना-१, दिनांक १२ जुलै, २०१९.
७) शासन निर्णय क्रमांक बीजीएस-२०२०/प्र.क्र.२१/योजना-१, दिनांक २१ जानेवारी, २०२१

**प्रस्तावना :-**

नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम ही १००% केंद्र पुरस्कृत योजना आहे. केंद्र शासनाने संदर्भिय पत्र क्र. ४ व ५ अन्वये सदर योजनेसाठी सन २०२०-२१ करीता निधी वितरीत केला आहे. संदर्भिय निर्णय क्र. ६ अन्वये "नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत व्यवस्थापन कार्यक्रम (NNBOMP)" या योजनेच्या अनुषंगाने, निधी आहरण व संवितरण करणेसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. तसेच मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. संदर्भिय पत्र क्र. २ अन्वये केंद्र शासनाकडून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता राज्यास ७००० बायोगॅस संयंत्राचे उद्दिष्ट मंजूर केलेले आहे. त्यानुसार संदर्भिय क्र. ३ अन्वये सन २०२०-२१ करिता राज्यातील सर्व जिल्हा परिषदांना त्यांच्या मागणीनुसार एकूण ७००० बायोगॅस संयंत्राचे उद्दिष्ट कळविलेले आहे. सदर उद्दिष्टांच्या अनुषंगाने सन २०२०-२१ या वर्षाकरिता रक्कम राज्यस्तरावरील PFMS प्रणालींसाठी नोंदणी करण्यात आलेल्या बँक बचत खात्यात जमा केलेली आहे.

उपरोक्त संदर्भिय शासन निर्णय क्र. ७ मधील रकाना क्रमांक २० मध्ये नमूद टर्न कि फी शुल्क ही रक्कम जिल्हयांच्या मागणीनुसार स्वतंत्र आदेशाद्वारे जिल्हयांना वितरीत करण्याचे नमूद असल्याने जिल्हयांची मागणी उपलब्ध करून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत व्यवस्थापन कार्यक्रमासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी बायोगॅस संयंत्र बांधकाम व अनुषंगिक बाबींसाठी संदर्भिय शासन निर्णय क्र. ७ मधील शासन

निर्णयान्वये एकूण रू. १०,९४,६५,०००/- (रू. दहा कोटी चौऱ्यान्नव लक्ष पासष्ठ हजार मात्र) इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाकडून उक्त संदर्भीय पत्र क्रमांक ४ व ५ अन्वये रू. ९०,००,०००/- (रू. नव्वद लक्ष मात्र) इतका निधी प्राप्त झालेला असून सदर निधी राज्यस्तरीय बँक बचत खात्यामध्ये जमा करण्यात आलेला आहे. उर्वरीत रु. १०,०४,६५,०००/- (रू. दहा कोटी चार लक्ष पासष्ठ हजार मात्र )इतका निधी शासनाने अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला असून राज्यस्तरावरील PFMS प्रणालींसाठी नोंदणी करण्यात आलेल्या पंजाब नॅशनल बँक, ठाणे शाखा येथील बँक बचत खात्यात जमा केलेली आहे.

२. सदर निधीपैकी, या बचत खात्याचे "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित केलेले मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी PFMS प्रणालीद्वारे संदर्भिय शासन निर्णय क्र. ७ मधील रकाना क्रमांक १९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण रक्कम रू. ९,१९,६५,००० (रू. नऊ कोटी एकोणीस लक्ष पासष्ठ हजार मात्र) संबंधित जिल्हयांना वितरीत करण्यासाठीचे आदेश निर्गमित केले आहेत. सदर शासन निर्णयातील रकाना क्रमांक २० मध्ये नमूद टर्न कि फी शुल्क ही रक्कम जिल्हयांच्या मागणी प्रमाणे स्वतंत्र आदेशाद्वारे जिल्हयांना वितरीत करण्याचे नमूद असल्याने जिल्हयांची मागणीनुसार रक्कम रु. १,७५,००,०००/- ( रू. एक कोटी पंच्याहत्तर लक्ष मात्र ) या रकमेपैकी पहिला, दुसरा व तिसरा हप्ता असा एकूण प्रति बायोगॅस संयंत्रास रु. २५००/- प्रमाणे रु.१,२०,९०,०००/- ( रू. एक कोटी वीस लक्ष नव्वद हजार मात्र ) इतकी रक्कम वितरीत करण्याची मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंत खर्च करणे बंधनकारक राहिल.

३. केंद्र शासनाच्या अपारंपरिक ऊर्जा स्त्रोत मंत्रालयाकडून मागण्या (क्लेम्स) पूर्णत: अदा केल्या जातील असे गृहीत धरुनच राज्य शासनाकडून जिल्हा परिषदांना उद्दिष्टांनुसार अनुदानाची रक्कम मंजूर करण्यात येते. या मागण्यांच्या बाबतीत केंद्र शासनाने नाकारलेली रक्कम यानंतर देण्यात येणाऱ्या अनुदानातून वळती करून घेण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम ही योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या संदर्भ क्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे अनुदानाचे दर लागू राहतील.

५. राज्यस्तरावरील PFMS प्रणालीसाठी नोंदणी करण्यात आलेल्या पंजाब नॅशनल बँक, ठाणे शाखा येथील बँक बचत खाते क्रमांक ११४४०००१०५११७२५२ यामध्ये जमा असलेल्या रक्कम रु.१,७५,००,०००/- ( रू. एक कोटी पंच्याहत्तर लक्ष मात्र ) पैकी रु. १,२०,९०,०००/- ( रू. एक कोटी वीस लक्ष नव्वद हजार मात्र ) इतका खर्च " मागणी क्रमांक एल-३, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ०१, बॉयो एनर्जी १०१, राष्ट्रीय बायो गॅस विकास कार्यक्रम (०१), राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम (०१) (०१) गोबर गॅस संयंत्रे बसविणे ( २८१० ००१६ ) (केंद्र पुरस्कृत योजना १०० टक्के ) ( कार्यक्रम ) ३३, अर्थसहाय्य " या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक १४ मध्ये दर्शविलेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

७. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रमासाठी वितरीत केल्या जाणाऱ्या अनुदानापैकी कोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचे विहित नमुन्यातील उपयोगिता

प्रमाणपत्र (ज्यामध्ये व्हाऊचर क्रमांक, अनुदान आहरित केल्याचा दिनांक, अनुदान आहरणाचे प्रयोजन, मुख्य लेखाशीर्ष, आऊटवर्ड नंबर, इत्यादी बाबीसह) महालेखाकार मुंबई व नागपूर यांना एप्रिल-२०२३ अखेर पर्यंत पाठविणे आवश्यक राहील. सन २०२०-२१ च्या उपयोगिता प्रमाणपत्रासंबंधी महालेखापाल कार्यालय मुंबई/नागपूर यांचेकडुन मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांना प्राप्त झालेले Clearances Certificate मे-२०२३ पर्यंत शासनास पाठविण्याची जबाबदारी कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांची राहील.

८. सदर योजनेच्या अंमलबजाणीसाठी दरवर्षी जिल्हा परिषदांना उद्दिष्टांच्या अनुषंगाने बाबनिहाय संपूर्ण अनुदान शासन स्तरावरून उपलब्ध करून देण्यात येते. त्यानुसार जिल्हा परिषदांनी पूर्ण केलेल्या भौतिक उद्दिष्टांच्या अनुषंगाने बाब निहाय खर्च करून आर्थिक वर्षअखेर ताळमेळ पूर्ण करावयाचे आहेत. बाबनिहाय रक्कम अखर्चित राहिल्यास, अशी शिल्लक रक्कम शासनास त्वरीत परत करण्यात यावी. अशी कोणतीही अखर्चित शिल्लक राहीलेली रक्कम पुढील आर्थिक वर्षात खर्च करता येणार नाही.

९. प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचे अचूक क्लेम्स (Claims) माहे जून, २०२३ अखेरपर्यंत शासनास सादर करण्यात यावेत. तसेच या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. नवीन राष्ट्रीय बायोगॅस व सेंद्रीय खत कार्यक्रम (NNBOMP) ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून, २० कलमी कार्यक्रमांच्या अंमलबजावणीचा घटक असल्याने मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर आदेशानुसार या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तातडीने अनुदान वितरित करावे.

१०. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अ.नौ.सं. क्र. ७८/१४४४ दिनांक २७.१०.२०२२ व वित्त विभागाच्या अ.नौ.सं.क्र. १५/अर्थोपाय, दि. ०२.०२.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने तसेच संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१३३२४४४५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.03.16 17:04:49 +05'30'

**( अरुण व. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता)

३. महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता)
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
७. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
९. जिल्हा लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा (सर्व)
१०. संचालक, लेखा कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
११. जिल्हा कोषगार अधिकारी (सर्व
१२. नियोजन विभाग, कार्यासन १४४३/१४४४, मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग, मंत्रालय (व्यय-१५ /अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१४. व्यवस्थापक, पंजाब नॅशनल बँक, शिल्पयान, शिवाजी पथ, जि. ठाणे ४०० ०६३
१५. कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-२, वित्त-७, वित्त-८, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१६. निवड नस्ती, कार्यासन योजना-५, ग्राम विकास विभाग.

**सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात बायोगॅस कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल**

| अ.क्र. | जिल्हा | सन २०२०-२१ करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २१ जानेवारी, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी संयंत्र संख्या व देय रक्कम | | **या शासन निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकुण | सर्वसाधारण | SC | ST | एकुण | | एकुण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू. २५०० /- प्रमाणे देय रक्कम | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** | **१२** | **१३** | **१४** |
| १ | ठाणे | २० | ० | १० | ३० | २० | ० | १० | ३० | ७५००० | ० | ० | ० |
| २ | पालघर | ३५ | ३ | ८७ | १२५ | ३० | २ | ८० | ११२ | ३१२५०० | ० | ० | ० |
| ३ | रायगड | १०० | २० | १७ | १३७ | ११७ | ८ | १२ | १३७ | ३४२५०० | ० | ० | ० |
| ४ | रत्नागिरी | १०० | २३० | ० | १३० | १२४ | ६ | ० | १३० | ३२५००० | ० | ० | ० |
| ५ | सिंधुदुर्ग | ४०० | २२ | ० | ४२२ | ४०० | २२ | ० | ४२२ | १०५५००० | ३८७ | ९६७५०० | ९६७५०० |
| ६ | नाशिक | २०१ | ४२ | २२ | २६५ | २०८ | १२ | ४५ | २६५ | ६६२५०० | ० | ० | ० |
| ७ | धुळे | २० | २० | २० | ६० | २० | २० | २० | ६० | १५०००० | ६० | १५०००० | १५०००० |
| ८ | नंदुरबार | १८ | ० | ७० | ८८ | १८ | ० | ७० | ८८ | २२०००० | ८८ | २२०००० | २२०००० |
| ९ | जळगांव | ९० | २० | १० | १२० | ९० | १६ | १० | ११६ | ३००००० | ११६ | २९०००० | २९०००० |
| १० | अहमदनगर | ५०० | ५२ | २० | ५७२ | ५४५ | २३ | ४ | ५७२ | १४३०००० | ५७२ | १४३०००० | १४३०००० |
| ११ | पुणे | ५०० | ३२ | २७ | ५५९ | ५२८ | २१ | १० | ५५९ | १३९७५०० | ४२४ | १०६०००० | १०६०००० |
| १२ | सातारा | २०० | २५ | ० | २२५ | २०८ | १७ | ० | २२५ | ५६२५०० | २६ | ६५००० | ६५००० |
| १३ | सांगली | २०० | २५ | ० | २२५ | १९९ | ६ | ० | २०५ | ५६२५०० | ० | ० | ० |
| १४ | सोलापूर | ३२० | ४२ | ० | ३६२ | ३३० | ३२ | ० | ३६२ | ९०५००० | ३६२ | ९०५००० | ९०५००० |
| १५ | कोल्हापूर | १००० | ४६ | ० | १०४६ | १०२६ | २० | ० | १०४६ | २६१५००० | १०४६ | २६१५००० | २६१५००० |
| १६ | औरंगाबाद | २५४ | ४४ | २ | ३०० | २७९ | १६ | ५ | ३०० | ७५०००० | ३०० | ७५०००० | ७५०००० |
| १७ | जालना | ११६ | २३ | ० | १३९ | ११७ | २२ | ० | १३९ | ३४७५०० | १०९ | २७२५०० | २७२५०० |
| १८ | परभणी | ८५ | ४० | ० | १२५ | ८५ | ३९ | ० | १२४ | ३१२५०० | १२४ | ३१०००० | ३१०००० |
| १९ | हिंगोली | ७५ | २२ | १५ | ११२ | ७५ | २२ | १५ | ११२ | २८०००० | ११२ | २८०००० | २८०००० |

**सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात बायोगॅस कायक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल**

| अ.क्र. | जिल्हा | सन २०२०-२१ करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २१ जानेवारी, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी संयंत्र संख्या व देय रक्कम | | **या शासन निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | | एकूण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू. २५०० /- प्रमाणे देय रक्कम | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** | **१२** | **१३** | **१४** |
| २० | बीड | २३१ | ३० | १० | २७१ | २३५ | २५ | ११ | २७१ | ६७७५०० | २७१ | ६७७५०० | ६७७५०० |
| २१ | नांदेड | ८० | ४२ | १० | १३२ | ८३ | ३३ | ८ | १२४ | ३३०००० | १२४ | ३१०००० | ३१०००० |
| २२ | उस्मानाबाद | १०० | ४० | ० | १४० | १०० | ४० | ० | १४० | ३५०००० | १४० | ३५०००० | ३५०००० |
| २३ | लातूर | ७५ | ३५ | १० | १२० | ७२ | ३५ | १० | १२० | ३००००० | १२० | ३००००० | ३००००० |
| २४ | अमरावती | ३८ | ३२ | १० | ८० | ५९ | १४ | ७ | ८० | २००००० | ८० | २००००० | २००००० |
| २५ | बुलढाणा | ९२ | ३५ | ३ | १३० | १०० | २६ | ४ | १३० | ३२५००० | ० | ० | ० |
| २६ | वाशिम | १० | १५ | १ | २६ | १० | १३ | १ | २४ | ६५००० | ० | ० | ० |
| २७ | अकोला | ५० | २७ | ६ | ८३ | १४ | ४ | २ | २० | २०७५०० | ० | ० | ० |
| २८ | यवतमाळ | २८ | ३७ | १० | ७५ | ३८ | ३० | ७ | ७५ | १८७५०० | ७५ | १८७५०० | १८७५०० |
| २९ | नागपूर | १०५ | ४५ | २० | १७० | १०३ | ३७ | २५ | १६५ | ४२५००० | १६५ | ४१२५०० | ४१२५०० |
| ३० | वर्धा | ७५ | ४७ | २० | १४२ | ७५ | ४० | २० | १३५ | ३५५००० | १३५ | ३३७५०० | ३३७५०० |
| ३१ | भंडारा | ७४ | ३० | १० | ११४ | ७४ | १२ | ० | ८६ | २८५००० | ० | ० | ० |
| ३२ | गोंदिया | १६३ | ७ | १० | १८० | १०३ | ३ | ९ | ११५ | ४५०००० | ० | ० | ० |

**सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात बायोगॅस कायक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वितरीत करावयाचा निधी तपशिल**

| अ.क्र. | जिल्हा | सन २०२०-२१ करीता जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट व त्यानुसार झालेले साध्य | | | | | | | | दिनांक २१ जानेवारी, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ करीता प्रति संयंत्र रू.२५०० /- प्रमाणे टर्न की फी शुल्क मंजूर रक्कम | टर्न की फी शुल्कसाठी संयंत्र संख्या व देय रक्कम | | **निर्णयान्वये वितरीत एकूण अनुदान रू.** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बायोगॅस संयंत्राचे प्रवर्गनिहाय उद्दिष्ट | | | | झालेले साध्य | | | | | | | |
| | | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | सर्वसाधारण | SC | ST | एकूण | | एकूण संयंत्र संख्या | प्रति संयंत्र रू. २५०० /- प्रमाणे देय रक्कम | |
| ३३ | चंद्रपूर | १३५ | ४५ | २० | २०० | १३५ | ४२ | २० | १९७ | ५००००० | ० | ० | ० |
| ३४ | गडचिरोली | १० | २५ | ६० | ९५ | १४ | ५ | ३७ | ५६ | २३७५०० | ० | ० | ० |
| | **एकूण** | **५५००** | **१०००** | **५००** | **७०००** | **५६३७** | **६६३** | **४४२** | **६७४२** | **१७५०००००** | **४८३६** | **१२०९००००** | **१२०९००००** |

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2023.03.16 17:05:56 +05'30'

( अरुण व. शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन